सन २०१७-१८ साठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी Medicinal Plants अंतर्गत मंजुर व वितरीत करण्यात आलेले अनुदान सन २०१९-२० मध्ये संबंधित पात्र शेतकऱ्यांना वितरीत करण्यास परवानगी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आयुष-०११९/प्र.क्र.६९/आरोग्य-७

१० वा मजला , गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.आयुष-०३१८/प्र.क्र.१०१अ/आरोग्य-७, दिनांक २८ मार्च, २०१८.
२) राष्ट्रीय औषधी वनस्पती मंडळ, आयुष मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.Z.१८०२०/३२/MH/२०१७-१८/NMPB-II, दिनांक ०६ डिसेंबर, २०१८.
३) संचालक आयुष, आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.आसंमुं/राआअ/केंपुयो/कार्य.समिती/बैठक/निर्णय/२०१८/आयु-२/८६७, दिनांक १८ जानेवारी, २०१९.
४) शासन समक्रमांक पत्र क्र.आयुष-०११९/प्र.क्र.६९/आरोग्य-७, दिनांक ०५ फेब्रुवारी, २०१९.
५) संचालक आयुष, आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा. क्र.आसंमुं/राआअ/२०१७-१८/Medicinal Plants/मंजुर रक्कम/वितरीत/कार्यवाही/२०१९/आयु-२/ ११६५४, दिनांक ०३ ऑगस्ट, २०१९.
६) शासन समक्रमांक पत्र क्र.आयुष-०११९/प्र.क्र.६९/आरोग्य-७, दिनांक ०४ सप्टेंबर, २०१९.
७) संचालक आयुष, आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.आसंमुं/राआअ/२०१७-१८/Medicinal Plants/मंजुर रक्कम/वितरीत/कार्यवाही/२०१९/आयु-२, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९.
८) शासन पत्र क्र.आयुष-०११९/प्र.क्र.६९/आरोग्य-७, दिनांक १५ नोव्हेंबर, २०१९.
९) संचालक आयुष, आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.आसंमुं/राआअ/२०१७-१८/Medicinal Plants/मंजुर रक्कम/वितरीत/कार्यवाही/२०१९/आयु-२/१७६७३, दिनांक ०३ डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

भारत सरकारने राष्ट्रीय आयुष अभियान (National AYUSH Mission) ही केंद्र पुरस्कृत योजना सप्टेंबर, २०१४ मध्ये सुरु केलेली आहे. सदर योजनेनुसार देशातील सामान्य जनतेकरीता

आयुष आरोग्य सेवा व शिक्षण उपलब्ध करणे, आयुर्वेदीक, होमिओपॅथीक व युनानी औषधांच्या दर्जात वाढ करणे व सातत्यपूर्ण गुणात्मक औषधी वनस्पती पुरवठा करणे इ. घटकांचा समावेश आहे. त्याकरीता सदर योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार संबंधित घटकांसाठी आवश्यक लागणाऱ्या निधीपैकी काही हिस्सा केंद्र शासनाने व काही हिस्सा राज्य शासनाने उपलब्ध करुन द्यावयाचा आहे.

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राष्ट्रीय आयुष अभियान (National AYUSH Mission) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यापोटी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी सर्वसाधारण (General) घटकाकरीता ६०% केंद्र हिश्श्यापोटी रु.१३५८.८८ लक्ष (रु.तेरा कोटी अठ्ठावन्न लक्ष अठ्ठयाऐंशी हजार फक्त) व त्यास समरुप ४०% राज्य हिश्श्यापोटी रु.९०५.९२३ लक्ष (रु.नऊ कोटी पाच लक्ष ब्याण्णव हजार फक्त) इतके अनुदान राज्य आयुष सोसायटीस वितरीत करण्यात आले आहे.

तद्‌नंतर उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये सदर अनुदान सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास परवानगी देण्यात आली होती. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.६ अन्वये पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून सदर अनुदान सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात औषधी वनस्पतींसाठी खर्च करण्यास परवानगी देण्यात आली.:-

१. सदर औषधी वनस्पतींच्या लागवडींची नोंद संबंधीत शेतकऱ्यांच्या ७/१२ मधील पेस पध्दतीमध्ये केल्याची खात्री करणे.
२. शेतकऱ्याने सदर वार्षिक औषधी वनस्पती विक्री केल्याची नोंद पावती सादर करावी.
३. औषधी वनस्पती बरेच वर्ष जगणारे झाड असल्यास, टप्याटप्याने निधी अनुज्ञेय करुन झाड जिवित राहील याची पुर्णत: खात्री करुन सदर निधी २०१८-१९ या आर्थिक वर्षात औषधी वनस्पती करिता वितरीत करणे.

तथापि, उपरोक्त संदर्भ क्र.७ अन्वये आयुष संचालनालयाने सन २०१७-१८ मधील औषधी वनस्पती या घटकांतर्गत मंजुर अनुदान औषधी वनस्पतींची लागवड केलेल्या शेतकऱ्यांना सन २०१९-२० मध्ये वितरीत करण्याची परवानगी देण्यात यावी व बरेच वर्ष जगणारे झाडाकरीता पुढील योग्य तपासणी केल्यानंतर अनुदान वितरीत केल्याच्या पुढील आर्थिक वर्षात खर्च करण्यास परवानगी मिळण्याची विनंती शासनास केली होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

आयुष मंत्रालय, केंद्र शासन यांच्या अर्धशासकीय पत्र क्र.Z.१८०२०/३२/MH/२०१९-२०/ NMPB-II, दिनांक ३०.०८.२०१९ पत्रान्वये सन २०१७-१८ मध्ये वितरीत केलेले अनुदान पूर्णपणे उपयोगात आणून प्रगती अहवाल सहा महिन्यात सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

तरी केंद्र शासनाच्या सदर दिनांक ३०.०८.२०१९ रोजीच्या पत्रातील अटींचे पालन करण्याच्या अधीन राहून राष्ट्रीय आयुष अभियान सन २०१७-१८ मध्ये मंजूर निधी हा सन २०१७-१८ मध्ये औषधी वनस्पतीची लागवड केलेल्या शेतकऱ्यांना सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास तसेच बरेच वर्ष जगणाऱ्या झाडाकरीता पुढील योग्य तपासणी केल्यावर टप्याटप्याने निधी अनुज्ञेय असल्याने अनुदान वितरीत केल्याच्या पुढील आर्थिक वर्षात खर्च करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४०७/२०१९/व्यय-१३, दिनांक ३०.१२.२०१९ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 202001301410083717 असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.02.14 16:59:43 +05'30'

**( मिलींद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक आयुष, आयुष संचालनालय, मुंबई.
५. संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई .
८. कृषी व पदुम विभाग (कार्यासन ९-A), मंत्रालय, मुंबई.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे-५.
१०.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग, कार्यासन अर्थसंकल्प / लेखा.
१३. निवडनस्ती (आरोग्य-७)